**कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई व सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई तसेच तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई या तीन शासकीय संस्थांना स्वायत्तता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एडीआर-२०१५/प्र.क्र.५४/तांशि-६**
**मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांक: २७ फेब्रुवारी, २०१७**

**प्रस्तावना :**

सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई व सर ज. जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई या तिन्ही महाविद्यालयामध्ये शिकविण्यात येणारे अभ्यासक्रम जुने व पारंपारिक आहेत. आजच्या तंत्रयुगात स्पर्धेला तोंड देण्यासाठी व स्पर्धेत टिकून राहण्यासाठी जागतिक दर्जाचे मागणी असलेले नवनवीन अभ्यासक्रम सुरु करणे, तसेच सध्या अस्तित्वात असलेल्या अभ्यासक्रमात काळाची गरज लक्षात घेऊन सुधारणा करणे क्रम प्राप्त आहे. संस्थेचा शैक्षणिक दर्जा वाढविण्यासाठी व विद्यार्थ्यांना अत्याधुनिक शैक्षणिक सोयी व सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी या संस्था सक्षम व बळकट करणे अत्यावश्यक आहे. महाविद्यालयामध्ये आजच्या गरजेनुरुप, व्यवसायाभिमूख, रोजगाराभिमुख लघु व मध्यम कालावधीचे प्रमाणपत्र व छंद जोपासण्याचे विविध अभ्यासक्रम तयार करणे आवश्यक आहे. याचा लाभ विविध वयोगटातील विद्यार्थी व इतरांकरिता मोठया प्रमाणात होवू शकतो. तसेच संस्थांमध्ये स्वत:च्या शैक्षणिक गरजा भागविण्यासाठी स्वतंत्र निधीची देखील उभारणी करण्याची क्षमता असून त्याचा योग्य विनियोग या संस्थांच्या विकासासाठी होऊ शकतो. याशिवाय या संस्थांना वेळोवेळी या व्यावसायिक क्षेत्रातील तज्ञ मान्यवर कलाकारांचे व्यावसायिक मागदर्शन प्राप्त होणे अत्यंत आवश्यक आहे. तसेच या शैक्षणिक संस्था व त्यांच्याशी संबंधित उद्योग समूहाबरोबर योग्य समन्वय साधून परस्पर दृढसंबंध स्थापित करुन विद्यार्थ्यांची रोजगार क्षमता वाढविण्याचे विविध उपक्रम सुरु करणे गरजेचे आहे. याकरिता या महाविद्यालयांना स्वायत्तता देण्याच्या अनुषंगाने धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर संस्थांना स्वायत्तता देण्याच्या अनुषंगाने पुढील योजनेस शासन मंजूरी देत आहे.

**शासन निर्णय :**

सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई व सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई या संस्थेमध्ये आंतरराष्ट्रीय दर्जाच्या अत्याधुनिक सोयी-सुविधा उपलब्ध करुन देणे व नवनवीन आधुनिक अभ्यासक्रम निर्माण करणे ही काळाजी गरज लक्षात घेता या संस्थांना खालीलप्रमाणे प्रशासकीय, आर्थिक व शैक्षणिक स्वायत्तता देण्यास व त्याप्रमाणे विद्यापीठ अनुदान आयोगास व संबंधित विद्यापीठास प्रस्ताव सादर करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. या तीनही शासकीय संस्थांना स्वायत्ततेच्या प्रयोजनार्थ संस्थेच्या स्तरावर विद्यापीठ अनुदान आयोगाच्या मान्यतेच्या अटी व शर्तीच्या अधीन राहून संस्था नोंदणी अधिनियम-१८६० अंतर्गत तसेच सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम-१९५० अंतर्गत संस्थेची नोंदणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. संपूर्ण स्वायत्तता अंमलात आणण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाच्या मार्गदर्शक तत्वांनुसार संस्थेच्या व्यवस्थापकीय व प्रशासकीय संरचनेत बदल करणे अपेक्षित आहे. यानुसार सर ज.जी. कला महाविद्यालय, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय व सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालयास स्वायत्तता प्रदान झाल्यावर विद्यापीठ अनुदान आयोगाच्या अटी व शर्तीनुसार नियामक मंडळाचे व अन्य वैधानिक समिती / परिषद यांचे नियमानुसार गठण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. वरील तीनही स्वायत्त संस्थांसाठी तीन स्वतंत्र नियामक मंडळ प्रस्तावित असून त्यांचे अधिकार, कर्तव्ये व समित्या खालीलप्रमाणे राहतील.

**वरील तीनही स्वायत्त संस्थांसाठी प्रत्येक संस्थेनिहाय नियामक मंडळ (Governing Council ) खालीलप्रमाणे राहील.**

(१) **नियामक मंडळाची रचना**

सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई व सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई या संस्थेचे नियमन नियामक मंडळाच्या (बोर्ड ऑफ गव्हर्नर्स) माध्यमातून करण्यात येईल. नियामक मंडळाचे अध्यक्ष हे दृष्यकलेमधील (चित्रकला, शिल्पकला, उपयोजित कला, वस्त्रकला, धातुकाम, मातकाम, अंतर्गत गृहसजावट) नामांकित कलाकार किंवा नामांकित कला शिक्षणतज्ञ / नामांकित वास्तुशास्त्रज्ञ किंवा नामांकीत वास्तुशास्त्रातील शिक्षण तज्ञ असावा. अध्यक्षांची व खालील तक्त्यातील अ.क्र. २ व ४ मधील पाच सदस्यांची नेमणूक शासन करेल.

**नियामक मंडळाचे इतर सदस्य खालीलप्रमाणे असतील.**

| अ.क्र. | सदस्य संख्या | सदस्यांचे क्षेत्र |
|---|---|---|
| १ | २ | नामांकित कलाकार / नामांकित वास्तुशास्त्रज्ञ किंवा कला क्षेत्रातील नामांकित तज्ञ/ वास्तुशास्त्र क्षेत्रातील नामांकित तज्ञ / उद्योग क्षेत्रातील नामांकित उद्योजक यामधून शासनाने नियुक्त केलेले सदस्य |
| २ | २ | किमान पाच वर्षाचा शैक्षणिक अध्यापनाचा अनुभव असलेले उच्च विद्याविभूषित कला / वास्तुशास्त्रातील अध्यापक |
| ३ | २ | नियामक मंडळाने नामनिर्देशित केलेले महाविद्यालयाचे माजी विद्यार्थी |
| ४ | ३ | कला /वास्तुशास्त्र क्षेत्रातील उद्योगाचे प्रतिनिधी |
| ५ | १ | विद्यापीठ अनुदान आयोगाचा प्रतिनिधी |
| ६ | १ | कुलगूरु, मुंबई विद्यापीठ यांनी नामनिर्देशित केलेली व्यक्ती |
| ७ | १ | अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेला अधिकारी, उपसचिव पेक्षा कमी दर्जा नसलेले अधिकारी |
| ८ | १ | अपर मुख्य सचिव वित्त / प्रधान सचिव /सचिव, वित्त विभाग |
| ९ | १ | संचालक, कला संचालनालय/तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (पदसिध्द) |
| १० | सदस्य सचिव - १ | अधिष्ठाता/संचालक, स्वायत्त संस्था (पदसिध्द)-सदस्य सचिव |

(२) **नियामक मंडळाचे अधिकार व कर्तव्ये :-**

१) संस्थेच्या विकासाकरिता बृहत आराखडा तयार करणे.

२) संस्थेच्या नियमनाकरिता परिनियम तयार करणे, राबविणे व त्यात आवश्यकतेनुरुप सुधारणा करणे.

३) संस्थेचे व्यवस्थापन व नियंत्रण करणे.

४) संस्थेसाठी नविन आकृतिबंध (मंजूर शासन पदाव्यतिरिक्त) मनुष्यबळ विकास धोरण ठरविणे.

५) निधी संकलन, व्यवस्थापन, सुरक्षा व संस्थेच्या मालमत्तेची व्यवस्था पहाणे.

६) अर्थ समितीच्या शिफारशीनुसार वार्षिक अंदाजपत्रकास संमती देणे व खर्चास मंजूरी देणे.

७) शैक्षणिक बाबीविषयी शैक्षणिक मंडळाने केलेल्या शिफारशीस मंजूरी देणे.

८) शिष्यवृत्ती बक्षिसे व पदके इ. संबंधी शैक्षणिक मंडळाने केलेल्या शिफारशी मंजूर करणे.

९) विद्यार्थी / शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या शिस्त व कल्याण याकडे लक्ष देणे.

१०) शासनाने मंजूर केलेल्या आकृतीबंधाशिवाय संस्थेच्या निधीतून शैक्षणिक, व्यवस्थापकीय, तांत्रिक, लिपिकवर्गीय व इतर पदे निर्माण करणे व त्यावर नेमणूक करणे.

११) देशातंर्गत व इतर देशातील संस्था/विद्यापीठ यांच्याबरोबर एकत्रितपणे संशोधन करणे, सल्लासेवा पुरविणे, इतर संस्थांबरोबर तेथील सुविधा वापरणे इ. बाबत सहकार्य करणे, संस्थेकरिता किंवा संस्थेच्यावतीने करार करणे.

१२) संस्थेच्या वतीने सर्व कायदेशीर बाबी नोंदविणे व संस्थेच्या वतीने बाजू मांडणे.

१३) जुनी यंत्रसामुग्री, पुस्तके इ. निर्लेखित करण्यासंबंधी समितीच्या शिफारशी मान्य करणे.

१४) मंडळाच्या समितीस गरजेनुसार अधिकार हस्तांतरीत करणे.

१५) वार्षिक अहवाल, वार्षिक लेखा व अर्थसंकल्प यावर विचार करुन संमती देणे, या सर्व बाबी तसेच मंडळाने केलेले ठराव राज्य शासनास सादर करणे.

१६) संस्थेच्या व्यवस्थापकीय व प्रशासकीय कार्यात सुसूत्रता आणण्याकरीता परिनियम तयार करणे व त्यात आवश्यकतेनुरुप सुधारणा करणे.

१७) संस्थेच्या शैक्षणिक दर्जाच्या मुल्यांकनाची पध्दती ठरविणे.

१८) समाजातील दुर्बल घटकांसाठी विशेष कार्यक्रम राबविणे.

१९) संस्थेच्या शैक्षणिक विकासासाठी व दर्जा वाढविण्याकरिता आवश्यक त्या सर्व उपाययोजना करणे, इत्यादी.

२०) उत्तमोत्तर संस्था/विद्यापिठ/उद्योगसमुह यांच्या सहकार्याने, शैक्षणिक कार्यक्रम, सल्लागार सेवा, चर्चासत्रे यांचे आयोजन करणे, निरंतर शिक्षण कार्यक्रम राबविणे, उद्योगधंदे व समाजाला सेवा पुरविणे.

२१) शैक्षणिक दर्जा वाढविण्याकरीता परराज्यातील/परदेशातील नामांकित शिक्षक तसेच उद्योगधंद्यातील तज्ञ यांच्या सेवा घेणे व देणे.

२२) अंतर्गत महसूल निर्माण करणे व त्याच्या वाटपाचे धोरण ठरविणे.

(३) **नियामक मंडळाच्या समित्या**

(I) शैक्षणिक मंडळ (Academic Council )
(II) विषय मंडळ ( Board of studies )
(III) परीक्षामंडळ
(IV) अर्थसमिती
(V) खरेदीसमिती
(VI) इमारत व बांधकाम समिती

**(I) शैक्षणिक मंडळ** (Academic Council) **– रचना**

१. अध्यक्ष - संस्थेचे अधिष्ठाता / संचालक हे शैक्षणिक मंडळाचे अध्यक्ष असतील.
२. सदस्य - संस्थेतील सर्व विभागांचे विभागप्रमुख
३. सदस्य - विभागप्रमुख किंवा अधिष्ठाता /संचालक यांनी नामनिर्देशित केलेला ज्येष्ठ अध्यापक
४. सदस्य – शैक्षणिक मंडळाने नामनिर्देशित केलेले दोन व्यावसायिक उद्योगक्षेत्रातील मान्यवर तज्ञ व्यक्ती
५. सदस्य – संचालकांनी नामनिर्देशित केलेली व्यक्ती

**(II) विषय मंडळ** (Board of studies) – **रचना**

१. अध्यक्ष - विभागप्रमुख
२. सदस्य - विद्यापीठामधील विभागप्रमुख किंवा त्यांचे प्रतिनीधी
३. सदस्य - २ ज्येष्ठ अध्यापक आळीपाळीने नामनिर्देशित केलेले
४. सदस्य - अधिष्ठाता /संचालकांनी नामनिर्देशित केलेले ३ विषयतज्ञ
५. सदस्य - २ व्यावसायिक तज्ञ किंवा अधिष्ठाता/संचालकांनी नामनिर्देशित केलेल्या २ व्यक्ती

**(III) परिक्षा मंडळ – रचना**

१. अध्यक्ष – अधिष्ठाता/संचालक
२. सदस्य – अधिष्ठाता/संचालकांनी नामनिर्देशित केलेल्या १० वर्षापेक्षा जास्त अनुभव असलेले ज्येष्ठ ३ अध्यापक
३. सदस्य - विद्यापिठाचे परीक्षा नियंत्रक किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले उप कुलसचिवपेक्षा कमी दर्जा नसलेली व्यक्ती
४. सदस्य - अधिष्ठाता / संचालकांनी नामनिर्देशित केलेली मुल्यमापन तज्ञ व्यक्ती
५. सदस्यसचिव – महाविद्यालयाचा प्रबंधक

**(IV) अर्थ समिती – रचना**

१. अध्यक्ष – संस्थेचे अधिष्ठाता/संचालक हे अर्थसमितीचे अध्यक्ष असतील.
२. १ सदस्य – महाविद्यालयाच्या व्यवस्थापनाने नामनिर्देशित केलेली व्यक्ती
३. २ सदस्य - अधिष्ठाता/संचालकांनी आळीपाळीने नामनिर्देशित केलेले २ ज्येष्ठ अध्यापक

४. १ सदस्य - उपसचिव (कला), शासन प्रतिनिधी

५. १ सदस्य सचिव - वित्त व लेखाअधिकारी, कला संचालनालय/तंत्र शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई किंवा कोणत्याही स्वायत्त संस्थेचा प्रबंधक

(V) **खरेदी समिती - रचना**

१. अध्यक्ष - अधिष्ठाता/संचालक

२. २ सदस्य - अधिष्ठाता/संचालकांनी नामनिर्देशित केलेले २ प्राध्यापक किंवा २ ज्येष्ठ अध्यापक

३. २ सदस्य - नियामक मंडळातील २ सदस्य

४. १ सदस्य - वित्त व लेखाधिकारी, कला संचालनालय/तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५. सदस्य - उप सचिव (कला) , शासन प्रतिनिधी

६. सदस्यसचिव - महाविद्यालयाचा प्रबंधक

(VI) **इमारत व बांधकाम समिती - रचना**

१. अध्यक्ष - अधिष्ठाता/संचालक

२. २ सदस्य - अधिष्ठाता/संचालकांनी नामनिर्देशित केलेले २ प्राध्यापक किंवा २ ज्येष्ठ अध्यापक

३. २ सदस्य - नियामक मंडळातील २ सदस्य

४. १ सदस्य - वित्त व लेखाधिकारी, कला संचालनालय/तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५. सदस्य - उप सचिव (कला), शासन प्रतिनिधी

६. सदस्य सचिव - महाविद्यालयाचा प्रबंधक .

**३.** सर ज. जी कला महाविद्यालय, मुंबई, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई व सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई या महाविद्यालयाचा कामकाज सोसायटी/नियामक मंडळामार्फत चालविण्यात येणार असून या महाविद्यालयांना **सेवाविषयक बाबींसंदर्भात** पुढीलप्रमाणे अटी व शर्ती लागू राहतील.

१) संस्थांचे कामकाज नियामक मंडळामार्फत चालविण्यास सुरुवात होण्यापुर्वी संस्थांच्या सेवेत प्रविष्ट झालेल्या सर्व नियमित शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांच्या सेवाशर्ती अन्य शासकीय कर्मचा-यांप्रमाणेच राहतील.

२) या कर्मचा-यांना सध्या लागू असलेल्या भविष्यनिर्वाह निधी योजना व निवृत्तीवेतन योजना प्रचलीत तरतूदीनुसार लागू राहतील.

३) संस्थांचे कामकाज नियामक मंडळामार्फत सुरु झाल्यानंतर शासनाने निश्चित केलेल्या पदाच्या आकृतीबंधाप्रमाणे मंजूर पदावरील नियमित स्वरुपात करण्यात येणाऱ्या नेमणूका या शासनाकडून

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत करण्यात येतील. जेणेकरुन शासनाने ठरवून दिलेले सेवाप्रवेश नियमाचे व बिंदूनामावलीचे पालन होईल.

४) शासनाने मंजूर केलेल्या आकृतीबंधाप्रमाणे शासनाद्वारे नियुक्त केलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचा वेतनावरील खर्च शासनाच्या एकत्रित निधीमधून भागविण्यात येईल.

५) स्वायत्त झाल्यानंतरही तीनही संस्थामधील आकृतीबंधानुसार शिक्षक / शिक्षकेतर मंजूर पदे शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या पध्दतीनुसार भरण्यात येतील. सदर प्रस्तावित स्वायत्ता संस्थामधील शासनाने निश्चित केलेली पदे ( शैक्षणिक संस्थेचे अधिष्ठाता वगळून ) शासनामार्फत म्हणजेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरण्यात येतील. तथापि, त्या संस्थांमधील अधिष्ठातांचे पद हे शोध समितीने केलेल्या शिफारशीनुसार शासनाद्वारे भरण्यात येईल.

६) शासनाने नियमित स्वरुपात नियुक्त केलेल्या शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना अन्य राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना लागू असलेले सर्व सेवा व शर्ती विषयक नियम लागू राहतील.

७) प्रस्तावित स्वायत्त संस्थाप्रमुखांचे सध्याचे अधिष्ठाता हे पदनाम अधिष्ठाता असेच राहील.

८) प्रस्तावित स्वायत्त संस्थेच्या अधिष्ठाताच्या नियुक्तीसाठी खालीलप्रमाणे शोध समिती असेल व त्या समितीद्वारे विहित सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार शैक्षणिक अर्हता व अनुभव असणाऱ्या पात्र उमेदवाराची शिफारस शासनास करेल.

- अध्यक्ष-अध्यक्ष, नियामक मंडळ (Governing Council)
- सदस्य - अप्पर मुख्यसचिव/प्रधान सचिव/सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.
- ३ सदस्य - नामांकित कलाकार/नामांकित वास्तुशास्त्रज्ञ किंवा कला क्षेत्रातील नामांकित तज्ञ / वास्तुशास्त्र क्षेत्रातील नामांकित तज्ञ किंवा कला / वास्तुशास्त्र क्षेत्रातील नामांकित संस्थेमधील प्राचार्य / अधिष्ठाता / संचालक.
- सदस्य - कला / वास्तुशास्त्र क्षेत्रातील उद्योगाचे नामांकित प्रतिनिधी
- सदस्य सचिव - संचालक, कला संचालनालय / संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९) या तीनही महाविद्यालयाना स्वायत्तता प्राप्त झाल्यानंतर संस्थास्तरावर आवश्यकतेनुरुप केवळ कंत्राटी स्वरुपात विहीत कालावधीसाठी लागणारी नविन पदे निर्माण करण्याचा अधिकार संबंधित महाविद्यालयाच्या नियामक मंडळास असेल. सदरच्या नवीन पदावर पदभरती त्या त्या पदाच्या प्रचलित सेवाप्रवेश नियमातील तरतूदी व बिंदूनामावली विचारात घेऊन कंत्राटी पदाच्या अटी शर्तीनुसार पदभरती करण्यात येईल.

१०) संस्थास्तरावर तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पध्दतीने पदे भरण्यासाठी निर्माण करण्यात येणाऱ्या पदाच्या वेतन व अन्य सेवा विषयक बाबींवर येणाऱ्या खर्चाची जबाबदारी ही पूर्णत: संबंधित महाविद्यालयाची असेल व त्याकरीता येणारा खर्च हा महाविद्यालयाच्या उत्पन्नाच्या स्त्रोतातून भागविण्यात येईल.

११) सदर नियुक्ती नियामक मंडळ कंत्राटी पध्दतीने करणार असल्यामुळे, कंत्राटाचा विहीत कालावधी संपल्यावर अशा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवा खंडीत करण्याची जबाबदारी नियामक मंडळाची राहील.

१२) नियामक मंडळाने कंत्राटी पध्दतीने नियुक्ती केलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासन सेवेवर हक्क सांगता येणार नाही अथवा त्यांच्या सेवा नियमित करता येणार नाहीत.

१३) कंत्राटी पध्दतीने नियुक्ती दिल्यानंतर शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवा समाप्तीचा दिनांक हे नियुक्ती आदेशात नमूद करण्यात यावा.

१४) कंत्राटी पध्दतीने नियुक्ती दिल्यानंतर शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे कोणतेही दायित्व शासनावर राहणार नाही.

१५) संस्थास्तरावर भरण्यात येणारी कंत्राटी पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेच्या बाहेर राहतील. तसेच सदरची कंत्राटी पदे ही शासकीय पदे म्हणून समजण्यात येणार नाहीत व त्या पदावर नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांना अन्य नियमित शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे कोणतेही लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

१६) संस्थास्तरावर निर्माण करण्यात येणारी तात्पुरती कंत्राटी पदे ही नियामक मंडळामार्फत स्वतंत्र निवड मंडळाची स्थापना करुन शासनाच्या सेवा प्रवेश नियमामधील तरतूदीनुसार बिंदूनामावलीच्या आधारे भरण्यात यावीत. सदर निवड मंडळात शासनाच्या प्रतिनिधीचा समावेश असेल.

४. सदरहू महाविद्यालयांना त्यांच्या **वित्तीय बाबींसदर्भात** पुढीलप्रमाणे अधिकार असतील.

१) स्वायत्त संस्थामधील विद्यार्थ्यांचे व इतर शुल्क, अंतर्गत महसुल स्वायत्त संस्थेकडे राहील. या स्त्रोतातून संस्थेने निर्माण केलेल्या पदाचे वेतन, संस्थेचा वेतनेतर व इतर खर्च भागविण्यात येईल.

२) शासनाच्या धोरणामुळे विद्यार्थ्यांना त्यांच्या शुल्कामध्ये देण्यात येणा-या सवलतीच्या रकमेची प्रतिपुर्ती शासनामार्फत करण्यात येईल. शिक्षण शुल्क, विकास शुल्क व अन्य शुल्क निर्धारीत करुन आकारण्याचे अधिकार नियामक मंडळास असतील. सदरचे शुल्क सदर महाविद्यालयाला स्वत:चा खर्च भागविण्यासाठी स्वत:कडे ठेवता येऊ शकेल व त्यामधून संस्थेची विकास कामे हाती घेता येतील. सदर प्रयोजनार्थ संबंधित संस्थेच्या नावे त्यांचे राष्ट्रीयकृत बॅकेत संयुक्त खाते उघडण्यात यावे. सदर खाते अधिष्ठाता व संस्थेतील अन्य जबाबदार अधिकारी कार्यान्वीत करतील.

३) स्वायत्तता प्रदान झालेल्या संस्थेने आंतरराष्ट्रीय दर्जाचे होणे अपेक्षित आहे. यासाठी आवश्यक तो निधी संबंधित संस्थांनी जास्तीत जास्त उपलब्ध करुन घेण्यात यावा.

४) संस्थेच्या विकासाच्या दृष्टीने संस्थेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांना त्या-त्या क्षेत्रातील अद्ययावत ज्ञान / बदलणारे तंत्रज्ञान अवगत असणे अत्यावश्यक असल्यामुळे, संस्थेच्या वार्षिक अर्थसंकल्पातील ठराविक रक्कम त्यांच्या प्रशिक्षणासाठी राखून ठेवावी. याबाबतचे प्रमाण नियामक मंडळाद्वारे ठरविण्यात यावे.

५) स्वायत्त संस्थामध्ये खालीलप्रमाणे विविध निधीची निर्मिती करण्यात यावी.

- कॉर्पस निधी (Corpus Fund) आणि देणगी निधी (Endowment Fund)
- जुनी, निकामी यंत्रसामुग्री बदलून त्या ठिकाणी प्रगत यंत्रसामुग्री घेण्यासाठी तसेच यंत्रसामुग्रीच्या व सुविधांच्या घसा-यापोटी आवश्यक निधी
- यंत्रसामुग्री व सुविधांच्या देखभालीसाठी निधी
- संस्थास्तरावर नियुक्ती केलेल्या कंत्राटी कर्मचा-यांसाठी नियमाप्रमाणे लागू असलेले अंशदान देण्यासाठीचा निधी

६) स्वायत्त संस्थांनी स्वत:चे उत्पन्न वाढविणे आवश्यक असल्याने संस्था उत्पानाचे स्त्रोत शोधेल. (उदा. औद्योगिक संस्था (Industrial Houses), शैक्षणिक सातत्य (Continuing Education), तपासणी व सल्ला देणे (Testing And Consultancy), माजी विद्यार्थ्यांकडून मदत घेणे (Alumni Association), संशोधनाकरीता प्रायोजक शोधणे (Sponsored Research)) केवळ शासनाच्या अनुदानावर विसंबून न राहता स्वत:चे उत्पन्न वाढवून आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होण्याचा प्रयत्न स्वायत्त संस्थांनी करावा. तसेच शैक्षणिक शुल्क, हेरिटेज फंड, देणगी इत्यादीच्या माध्यमानेसुध्दा उत्पन्न वाढविणे आवश्यक असेल.

७) कार्यक्रमाच्या सुलभ व जलद अंमलबजावणीसाठी शासकीय व शासन अनुदानित संस्थांच्या खर्चाचे लेखा परीक्षण प्रमाणित सी.ए. कडून करुन घेण्यात यावे. तसेच आवश्यक त्या ठिकाणी नेहमीच्या पध्दतीने महालेखाकार कार्यालयाकडून लेखा परीक्षण करण्यात येईल.

८) वित्तीय बाबी संदर्भात पारदर्शकता ठेवण्याकरिता व आर्थिक शिस्तीसाठी विहित कार्यपध्दतीनुसार खर्चाचे लेखे ठेवावेत. सदर खर्चाचे लेखे शासनास मागणीनुसार निरिक्षणाकरिता उपलब्ध करुन देणे संस्थांना बंधनकारक राहील.

९) स्वायत्त संस्थेमधील सर्व मंजूर शिक्षक व शिक्षकेत्तर पदांचे वेतन अनुदान एक रकमी रक्कम (ब्लॉक ग्रॅन्ट) देण्याची जबाबदारी शासनाची राहील. सदर रकमेमध्ये दरवर्षी १०% वाढ करण्यात येईल. मात्र ही रक्कम वेतनावर खर्च करणे संस्थांना बंधनकारक राहील व त्यामध्ये गरजेनुसार बदल करण्यात येईल. ब्लॉक ग्रॅन्ट रक्कमेचे वाटप संचालक, कला संचालनालय / संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई करतील.

१०) या तीन स्वायत्त संस्था फी वाढ व इतर शुल्क याबाबतच निर्णय स्वत: घेतील. वेतनावरील खर्च राज्य सरकार करेल. वेतनेत्तर खर्च संस्था शिक्षणशुल्क व अन्य शुल्काच्या महसूलातून करेल. प्रत्येक ५ वर्षानंतर राज्यशासन Block grant Scheme चा आढावा घेऊन व आवश्यकता भासल्यास त्यामध्ये सुधारणा करेल.

अ) शासनाने करावयाचा वेतनावरील खर्च :- (रु. लाखात)

| संस्थेचे नाव | वर्ष २०१५-१६ | वर्ष २०१६-१७ | वर्ष २०१७-१८ | वर्ष २०१८-१९ | वर्ष २०१९-२० | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई | ३२०.०० | ३५२.०० | ३८७.०० | ४२६.०० | ४६८.०० | **१९५३.००** |
| सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | २५१.०० | २७६.०० | ३०५.०० | ३४०.०० | ३७५.०० | **१५४७.००** |
| सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई. | ३२६.०० | ३५९.०० | ३९५.०० | ४३५.०० | ४७९.०० | **१९९४.००** |
| **एकूण** | **८९७.००** | **९८७.००** | **१०८७.००** | **१२०१.००** | **१३२२.००** | **५४९४.००** |

ब) संस्थेने स्वत:च्या आर्थिक स्त्रोतातून करावयाचा वेतनेत्तर खर्च :- (रु. लाखात)

| संस्थेचे नाव | वर्ष २०१५-१६ | वर्ष २०१६-१७ | वर्ष २०१७-१८ | वर्ष २०१८-१९ | वर्ष २०१९-२० | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई | २०.८० | २२.८० | २४.२८ | २६.४२ | २८.४२ | **१२२.७२** |
| सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई | १६.०० | १७.६० | २०.१५ | २२.०० | २३.६० | **९९.३५** |
| सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई. | ३२.०० | ३५.०० | ३९.०० | ४३.०० | ४७.०० | **१९६.००** |
| **एकूण** | **६८.८०** | **७५.४०** | **८३.४३** | **९१.४२** | **९९.०२** | **४१८.०७** |

या तीन स्वायत्त संस्थांसाठी वरील -अ॰ प्रमाणे ५ वर्षासाठी एकूण अनुदान रु.५४.९४ कोटी इतके असून, त्यापैकी आर्थिक वर्ष २०१६-१७ साठी रु. ९.८७ कोटी इतका निधी आवश्यक आहे.

५. सदर महाविद्यालयांना खाली नमूद केल्याप्रमाणे शैक्षणिक स्वायत्तता असेल.

१) संस्थेकरीता दर ५ वर्षाकरिता शैक्षणिक बृहत आराखडा तयार करणे.

२) अभ्यासक्रम सुरु करणे / बंद करणे, अभ्यासक्रमात बदल करणे यास मान्यता देणे.

३) शोध व विकास कार्यक्रम राबविणेसंदर्भात धोरण निश्चित करणे.

४) अन्य शैक्षणिक संस्थांच्या समन्वयाने शैक्षणिक विकास घडविण्याकरिता प्रोत्साहन देणे.

५) स्वतंत्र परीक्षा व मुल्यमापन पध्दती राबविणे.

६) उद्योगधंदे व समाजाच्या गरजेनुसार निरंतर शिक्षणाचे कार्यक्रम / सेवा राबविणे.

७) प्रस्तावित स्वायत्त संस्थांना त्यांच्या स्तरावर पूर्वीप्रमाणे विविध निरंतर शैक्षणिक अभ्यासक्रम, छंद वर्ग, चित्रकला प्रदर्शन इ. उपक्रम आयोजित करण्यास, तसेच संस्थेतील अध्यापकांद्वारे गरजू उद्योग/ संस्थांना सल्लाविषयक सेवा उपलब्ध करुन देण्यास अनुमती असेल. तथापि, सदर प्रयोजनार्थ संस्थेने निश्चित केलेले शुल्क आकारुन व विहित अटी /शर्तींच्या अधिन राहून उपलब्ध करता येतील. मात्र सदर प्रयोजनार्थ येणारा सर्व खर्च (मानधन, स्टेशनरी, वीज इत्यादी ) वजा केल्यानंतर शिल्लक रहाणाऱ्या महसूलाच्या ५० टक्के महसूल शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा करण्यात येईल.

८) स्वायत्तता ही भविष्यात अधिक दर्जा व निर्मितीक्षमता (नवनिर्माण क्षमता) मिळविण्याचे साधन असेल. स्वायत्त संस्था, त्या देत असलेले शिक्षण, त्या अंतर्गत बाबी व शिक्षणाचा दर्जा याकरिता सर्वस्वी जबाबदार असतील. तसेच, विद्यार्थ्यांचे मुल्यमापन करण्यास या संस्था जबाबदार असतील, जे मूळ विद्यापिठास, पदवी, पदव्युत्तर पदवी प्रमाणपत्र देण्यासाठी स्वीकारार्ह असेल.

९) संस्थांचा शैक्षणिक दर्जा समाधानकारक नाही असे संबंधीत विद्यापीठास वाटल्यास त्या संदर्भात एक समिती नेमून त्याबाबतचा अहवाल विद्वत सभेमार्फत शासनाकडे पाठविण्याचा अधिकार कुलगुरुंना असेल. या अहवालावर शासन जो निर्णय घेईल तो अंतिम राहील.

१०) संस्थेमधील शैक्षणिक मंडळाचे कार्य खाली नमूद केल्याप्रमाणे शैक्षणिक स्वरुपाचे असेल.

शैक्षणिक मंडळाचे (Academic Council) अधिकार व कर्तव्ये पुढीलप्रमाणे असतील.

(१) शैक्षणिक बृहत आराखडा तयार करणे.

(२) विविध विषयांच्या अभ्यासक्रमात बदल करणे, पाठयक्रम ठरविणे.

(३) शोध व विकास कार्यक्रम तयार करणे.

(४) परीक्षा व मुल्यांकनाच्या पध्दती ठरविणे.

(५) सल्लागार समिती किंवा तज्ञ समिती नेमून विविध विभागातील शैक्षणिक कामात सुधारणा करण्याकरिता मदत घेणे, विभागप्रमुख समन्वयक म्हणून काम करतील.

(६) संस्थेचे शैक्षणिक परीक्षण (Academic Audit)

(७) शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचा-यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम राबविणे.

(८) शैक्षणिक मंडळाचे सदस्य, संस्थेतील शिक्षक, बाहेरील तज्ञ यांच्याकडून आलेल्या शैक्षणिक समस्या सोडविणे.

(९) विविध विभागांशी संबंधित सल्लागार समित्यांच्या शिफारशी मंडळास कळविणे.

(१०) विभागातील कामांचा आढावा घेऊन आवश्यक कार्यवाही करणे, मंडळास शिफारशी करणे.

(११) ग्रंथालयाच्या कामावर देखरेख करणे.

(१२) संशोधनास प्रोत्साहन देणे.

(१३) वर्गात, प्रयोगशाळेत शिस्त राखणे, अभ्यासक्रमाबरोबरच व्यक्तिमत्व विकासास प्रोत्साहन देणे या संदर्भात मंडळास अहवाल देणे.

(१४) शिष्यवृत्या, पदके, बक्षिसे इ. प्रदान करणे.

(१५) पदांशी संबंधित कर्तव्ये व जबाबदा-या ठरविणे.

(१६) विविध अभ्यासक्रमाचे शुल्क निश्चित करण्यासाठी नियामक मंडळास शिफारस करणे.

११) शैक्षणिक मंडळाची ( Academic Council ) कार्यपध्दती पुढीलप्रमाणे असेल.

(१) शैक्षणिक मंडळाच्या वर्षातून किमान चार सभा आयोजित करण्यात येतील.

(२) शैक्षणिक मंडळाची विशेष सभा अध्यक्ष स्वत: किंवा शैक्षणिक मंडळाच्या किमान २० टक्के सदस्यांच्या लिखित मागणीवरुन आयोजित करतील.

(३) एकूण शैक्षणिक मंडळाच्या सदस्यांचा एक तृतीयांश एवढी संख्या गणपूर्ति करता आवश्यक राहील.

(४) प्रत्येक सभेकरीता लिखित सुचना प्रबंधक कमीतकमी एक आठवडा आधी देतील. त्यात कार्यसूचीचा समावेश राहील.

(५) तातडीच्या कामाकरीता अधिष्ठाता, आकस्मित निकडीची सभा कमी कालावधीची सूचना देऊन बोलावू शकतील.

(६) कुठल्याही प्रश्नावर चर्चेअंती अध्यक्षांचा निर्णय अंतिम राहील.

(७) प्रबंधक इतिवृत्त संकलन करतील. इतिवृत्ताची प्रत सर्व सदस्यांना पाठविली जाईल. काही सूचना / सुधारणा असल्यास पुढील सभेत ठेवून त्यावर शिक्कामोर्तब करुन अध्यक्षांची स्वाक्षरी होईल. सदर इतिवृत्त पुस्तिकेत नोंदविले जाईल व ते सर्व सदस्यांना आपल्या वेळेत अवलोकनार्थ उपलबध राहील.

(८) ज्या विषयांवर, शैक्षणिक मंडळाच्या पुढील सभेत बैठकी अगोदर अंमलबजावणी करणे अपेक्षित आहे. त्या बाबींवर विभागप्रमुख व प्राध्यापक यांच्या समितीमार्फत अधिष्ठाता निर्णय घेतील.

१२) शैक्षणिक मंडळ गरजेनुसार खालीलप्रमाणे विविध समित्या गठित करेल.

१. ग्रंथालये समिती
२. शिष्यवृत्ती समिती
३. प्रवेश समिती
४. तक्रार निवारण समिती
५. विद्यार्थी मार्गदर्शन समिती
६. नियोजन व मुल्यमापन समिती

६. वरील तीनही महाविद्यालयांकरिता प्रस्तावित असलेल्या स्वायत्ततेसंदर्भातील उपरोक्त नमूद बाबींना विद्यापीठ अनुदान आयोगाच्या विहित अटी / शर्तींच्या व विद्यापीठ कायद्यातील तरतुदींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे. सबब, यासंदर्भात विद्यापीठ अनुदान आयोगाच्या विहित अटी / शर्तीनुसार अमंलबजावणी करण्यात यावी.

७. संबंधीत विद्यापीठांनी या महाविद्यालयांना स्वायत्तता मिळाल्यानंतर त्यांच्या Statute मध्ये आवश्यक ते बदल करणे आवश्यक राहील.

८. उपरोक्त तीनही महाविद्यालयांनी स्वायत्तता प्राप्त करण्याच्या अनुषंगाने राष्ट्रीय आकलन आणि प्रमाणन परिषद ( National Assessment and Accreditation Council ) / राष्ट्रीय प्रमाणन मंडळ ( National Board of Accreditation ) या संस्थांकडे मुल्यांकन दर्जा निश्चितीबाबत विनाविलंब अर्ज सादर करण्याची कार्यवाही करावी.

९. तसेच, या महाविद्यालयांना स्वायत्तता प्राप्त करण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोग यांचेकडे विहीत प्रक्रिया अवलंबून विनाविलंब रितसर अर्ज सादर करण्याची कार्यवाही करावी तसेच, सदर प्रयोजनार्थ विद्यापीठ अनुदान आयोगाच्या प्रचलीत योजने अंतर्गत ( Financial Assistance to proposed Autonomous ) अनुदान उपलब्ध होणार असल्यास त्याअनुदानाचा लाभ घेण्याकरितादेखील आवश्यक ती कार्यवाही विनाविलंब करावी.

१०. वरील तीनही शासकीय संस्थांना स्वायत्तता देण्याच्या अनुषंगाने विविध औपचारिक कार्यवाहीची पूर्तता विहित कालमर्यादेत होण्यासाठी संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई व प्र.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती/उपसमिती गठीत करण्यात यावी. त्यामध्ये वरील तीनही संस्थांच्या अधिष्ठातांचा सदस्य म्हणून समावेश असेल. सदर समितीकडून संबंधित विद्यापीठ व सक्षम यंत्रणांची मान्यता घेण्याची कार्यवाही करण्यात येईल.

११. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६९१/व्यय-५, दिनांक १८ नोव्हेंबर,२०१६ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र.२०१७०२२७१४५१५९०००८असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr.Kiran Patil

Digitally signed by Dr.Kiran Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=657661007c4f6885bf8deae62f13606632589e592d8c18ceb9a49bfd30471850, cn=Dr.Kiran Patil
Date: 2017.03.01 18:00:14 +05'30'

**(डॉ.किरण पाटील)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, मलबार हिल, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सचिव मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
८. सचिव, आर्थिक कार्य विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली.
९. सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली.
१०.संचालक, राष्ट्रीय परियोजना कार्यान्वयन एकक, नोएडा (यु.पी.)
११.संचालक, टेक्निकल टिचर्स ट्रेनिंग इन्स्टिटयुट, भोपाळ.
१२.संचालक, ऑल इंडिया कॉन्सिल ऑफ टेक्निकल एज्युकेशन, नवी दिल्ली.
१३.संचालक, इंडियन इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी. मुंबई.
१४. अ.मु.सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.प्रधान सचिव , विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. महासंचालक, माहिती व जन संपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१९.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०.संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
२२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
२३.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
२४.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
२५.अधिष्ठाता, सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई.
२६.अधिष्ठाता, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई.
२७.प्राचार्य, सर ज. जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय, मुंबई
२८.निवड नस्ती.